# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, २०२३

---

**अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी**

**प्रश्नांची एकूण संख्या - २०**

---

### हिवरखेड (ता.तेल्हार, जि.अकोला) येथे नगरपंचायत स्थापन करणेबाबत

**(१) १०३२८ (०६-०१-२०२२) श्री.अमोल मिटकरी : तारांकित प्रश्न क्रमांक ७२१६ ला दिनांक १० मार्च, २०२१ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिवरखेड (ता.तेल्हार, जि.अकोला) येथे नगरपंचायत स्थापन करण्याप्रकरणी अखिल भारतीय ग्रामीण पत्रकार मंचाचे अध्यक्ष यांनी दिनांक १५ ऑगस्ट, २०२१ रोजी बेमुदत उपोषण सुरु केले असून लोकप्रतिनिधी यांच्याकडून मा.नगरविकास मंत्री यांना दिनांक १८ ऑगस्ट, २०२१ रोजी वा त्या सुमारास हिवरखेड नगरपंचायत होणेबाबतच्या प्रलंबित प्रकरणी निवेदन देण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हिवरखेड ग्रामपंचायतीला नगरपंचायतीचा दर्जा देण्याबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी अकोला यांनी दिनांक २३ डिसेंबर, २०२० रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला असता, शासनाने प्रस्तावाची तपासणी करुन त्याबाबतची अपुरी माहिती व कागदपत्रे सादर करण्याचे जिल्हाधिकारी, अकोला यांना दिनांक १८ जानेवारी, २०२१ रोजीच्या शासन पत्रान्वये कळविल्यानुसार जिल्हाधिकारी, अकोला यांनी सदर माहिती मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला यांना दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२१ रोजीच्या पत्रान्वये कळविले असूनही त्यांचा प्रस्ताव अद्याप अप्राप्त असल्याचे जिल्हाधिकारी, अकोला यांनी शासनास कळविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने सदर प्रकरणी चौकशी केली आहे काय, चौकशीनुसार सदर अहवाल प्राप्त होण्याच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०९-०१-२०२३) :** (१) होय.

(२) व (३) • यामध्ये नमूद केलेली बाब अंशत: खरी आहे.

- हिवरखेड (ता.तेल्हारा, जि.अकोला) येथे नगरपंचायत स्थापन करण्याबाबत जिल्हाधिकारी, अकोला यांच्याकडून दिनांक २८ जुलै, २०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला. त्यानुसार शासनाने दिनांक १३ जून, २०२२ रोजी याबाबत प्राथमिक उद्‌घोषणा निर्गमित केली आहे.

- प्राथमिक उद्‌घोषणेनुसार ३० दिवसाच्या कालावधीत संबंधित नागरिकांचे आक्षेप मागविण्यात आले होते.
- सदरच्या प्राथमिक उद्घोषणेवर गावातील नागरिकांनी आक्षेप नोंदवून त्यास विरोध केला आहे, अशी बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. तसेच नागरिकांच्या विरोधामुळे हिवरखेड नगरपंचायत करण्याची कार्यवाही स्थगित ठेवण्याची मा.लोकप्रतिनिधी यांनी देखील शासनाकडे मागणी केली आहे.
- वरील बाबी विचारात घेऊन शासनाने याबाबतची पुढील कार्यवाही स्थगित ठेवण्याबाबत निर्णय घेतला असून सदर बाब सर्व संबंधितांना दिनांक ९ नोव्हेंबर, २०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर महानगरपालिकेअंतर्गत करमणूक कर आकारणी संदर्भात शासनाकडे प्रलंबित प्रस्तावाबाबत

**(२) ११४०९ (०६-०१-२०२२) श्री.प्रवीण दटके, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात करमणूक कर आकारण्याचे अधिकार शासन राजपत्र दिनांक २९ मे, २०१७ अन्वये स्थानिक स्वराज संस्थांना दिले परंतु नागपूर महानगरपालिकेच्या करमणूक कर आकारणी संदर्भात शासनाकडे प्रलंबित प्रस्तावाबाबत पुढील कोणतेही दिशानिर्देश शासनाने महानगरपालिकेस दिले नसल्याचे माहे सप्टेंबर, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर महानगरपालिकेकडून करमणूक करासंदर्भात जीएसटी परतावा मिळणेबाबत शासनाकडून उचित निर्देश प्राप्त होण्यासंबंधी दिनांक १० जानेवारी, २०१८ व दिनांक २८ फेब्रुवारी, २०११ अन्वये पत्रव्यवहार करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने महानगरपालिकेस करमणूक कर संदर्भात जीएसटी परतावा मिळणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) वित्त विभाग व महसूल विभागाच्या निर्देशानुसार याबाबत नागपूर महानगरपालिकेकडून कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ‘राजर्षी शाहू महाराज परदेशी शिष्यवृत्ती’ च्या रकमेत वाढ करण्याच्या प्रस्तावाबाबत

**(३) ११७२६ (०५-०१-२०२२) श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुसूचित जाती व नवबौध्द विद्यार्थ्यांना परदेशातील नामांकित विद्यापीठामध्ये उच्चशिक्षण घेता यावे यासाठी ‘राजर्षी शाहू महाराज परदेशी शिष्यवृत्ती’ योजना लागू केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू शिष्यवृत्ती योजनेंतर्गत विदेशात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना बँकांचे कमिशन, जीएसटी आणि परदेशी चलनाचा दर यामुळे मंजूर रकमेपेक्षा कमी रक्कम मिळत असल्याने या रक्कमेत वाढ करण्याचा प्रस्ताव सामाजिक न्याय विभागाकडून शासनाकडे पाठवण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू प्रस्तावाचे स्वरूप काय आहे आणि या प्रस्तावावर शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०८-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) परदेशात शिक्षण घेत असणाऱ्या विद्यार्थ्यांना तसेच विद्यापिठाला आयुक्तालयामार्फत मंजूर करण्यात आलेली शिक्षण फी व निर्वाह भत्याची रक्कम मंजूर झाल्यानंतर प्रचलित पध्दतीनुसार उशिराने व कमी प्रमाणात संबंधित विद्यार्थी व विद्यापीठास प्राप्त होत असल्याने विद्यार्थी, पालक व विद्यापिठाच्या तक्रारी आयुक्तालयास प्राप्त होत असल्याने आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी त्यांच्या दिनांक ०६/०१/२०२२ च्या पत्रान्वये राजर्षी शाहू महाराज परदेश शिष्यवृत्ती योजनेची शासनस्तरावरून मंजूर व वितरित रक्कम/ आर्थिक तरतूद आयुक्तालय स्तरावर काढून घेऊन विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर केल्यानंतर, देयक कोषागारात सादर न करता, मंजूर शिष्यवृत्तीची रक्कम संबंधित विद्यापीठ व विद्यार्थ्यास अदा करण्याची बाब धोरणात्मक असल्याने शासनाची परवानगी मिळण्याची विनंती केलेली होती. परंतू, सदर प्रस्तावात नमूद बाब शासनाच्या निधी वितरण तथा वापराच्या धोरणापेक्षा वेगळी असल्याने भविष्यात याबाबत वित्तीय अनियमितता होवू नये यास्तव याबाबत वित्त विभागाची परवानगी/ अभिप्राय घेण्यात आला असता याबाबत वित्त विभागाने परदेश शिष्यवृत्तीची आर्थिक तरतूद आयुक्तालय स्तरावर काढून घेवून विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर केल्यानंतर देयक कोषागारात सादर न करता मंजूर शिष्यवृत्तीची रक्कम संबंधित विद्यापीठ व विद्यार्थ्यांना अदा केल्यास त्यावर कोणाचेही नियंत्रण असणार नाही आणि वित्तीय अनियमितता होण्याची शक्यता विचारात घेता प्रस्तावास मंजुरी देण्यात येवू नये या अभिप्रायासह संबंधित प्रस्ताव नामंजूर केलेला आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माहुल, मुंबई येथील पाणथळ जमिनीवर टाकण्यात आलेल्या डेब्रिजमुळे खारफुटीचे नुकसान झाल्याबाबत

**(४) ११७३२ (०५-०१-२०२२) श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माहुल, मुंबई येथील सुमारे पाऊण किमी क्षेत्रावरील पाणथळ जमिनीवर गत एक महिन्यापासून टाकण्यात येत असलेल्या डेब्रिजमुळे खारफुटीचे नुकसान झाल्याचे दिनांक ८ डिसेंबर, २०२१ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय निष्पन्न झाले आहे, त्यानुषंगाने सदर संरक्षित जागेवर डेब्रिजचे डम्पिंग करून खारफुटीच्या नुकसानीस जबाबदार असणाऱ्या संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०२-१२-२०२२) :** (१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई यांच्याकडून प्राप्त अहवालानुसार मौजे माहुल येथील न.भु.क्र.१ पै, सर्व्हे क्र. ७२ पै मध्ये वनविभागाच्या ताब्यातील अधिसूचित क्षेत्र व अधिसूचित क्षेत्रापासून ५० मी. क्षेत्रात अनधिकृत भराव केल्याचे दिनांक १५/०१/२०२१ रोजीच्या गस्तीदरम्यान निदर्शनास आले होते.

(२) उपरोक्त प्रमाणे निदर्शनास आल्यावर सदर घटनेबाबत रौड गुन्हा क्र.१ ई/२०२०-२१, दिनांक १५/०१/२०२१ अन्वये वनगुन्हा नोंदविण्यात आलेला असून चौकशीमध्ये २ आरोपींना दिनांक १७/०२/२०२१ रोजी अटक करून मा.न्यायालयात हजर करण्यात आले होते. तसेच वनगुन्हेकामी चौकशी करताना वनगुन्ह्यांमध्ये डम्पिंग करण्यासाठी वापर करण्यात आलेल्या ४ वाहनांवर कायदेशीर कारवाई करण्यात आलेली आहे व आरोपी यांचेविरुध्द मा.न्यायालयात दोषारोप पत्र दाखल करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भिवंडी – कल्याण (जि.ठाणे) तालुक्यांना जोडणाऱ्या राज्यमार्ग क्र. ४० वरील गोवे आणि काटई पथकर नाक्यावर अवैध टोल वसुली सुरु असल्याबाबत

**(५) ११७३६ (२९-०६-२०२२) श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिवंडी–कल्याण (जि.ठाणे) तालुक्यांना जोडणाऱ्या राज्यमार्ग क्र. ४० वरील गोवे आणि काटई पथकर नाक्यावर टोल वसुलीस महाराष्ट्र मोटार वाहन कर अधिनियम अंतर्गत क्र. खाक्षेस-२००४/प्र.क्र.३२५/रस्ते-८ ह्या अधिसूचनेनुसार कंत्राटदारास दिनांक १० ऑक्टोबर, २०१८ ते दिनांक ९ एप्रिल, २०१९ पर्यंत शेवटची मुदतवाढ देण्यात आली असतानाही आजमितीस सदरहू पथकर नाक्यावर टोल वसुली सुरु असल्याची बाब दिनांक ६ डिसेंबर, २०२१ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने अवैध टोल वसुली करणाऱ्या कंत्राटदाराविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०७-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.

शासनाने पथकर वसुलीस दिनांक ०९/०३/२०२१ पर्यंत मुदतवाढ दिली होती व दिनांक ०९/०३/२०२१ रोजी रात्री १२.०० वाजता पथकर वसुली बंद करण्यात आली आहे.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वसई-विरार महानगरपालिकेत कंत्राटी कर्मचारी पुरविण्याच्या कामात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(६) ११७३८ (०७-१२-२०२२) श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई–विरार महानगरपालिकेत सन २०१२ ते सन २०१८ या कालावधीत कंत्राटी कर्मचारी पुरविण्याचा ठेका घेतलेल्या २५ ठेकेदारांनी महानगरपालिकेच्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांशी संगनमत करून कंत्राटी कर्मचाऱ्यांची आर्थिक पिळवणूक तसेच वार्षिक कर चोरी करून रुपये १२२ कोटींचा अपहार केल्याप्रकरणी चौकशी करण्यासाठी शासनाने विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबतचा अहवाल सदरहू समितीने शासनास सादर केला आहे काय, अहवालात करण्यात आलेल्या शिफारसींचे थोडक्यात स्वरूप काय आहे, उक्त अहवालात करण्यात आलेल्या शिफारसी अन्वये अपहारात सहभागी असलेल्या महानगरपालिकेतील अधिकारी/कर्मचारी यांच्यावर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची सर्वसाधारण कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०७-१२-२०२२) :** (१) व (२) वसई-विरार शहर महानगरपालिकेत सन २०१२ ते सन २०१८ या कालावधीत कंत्राटी कर्मचारी पुरविण्याकरीता नियुक्त करण्यात आलेल्या ठेक्याच्या कामामध्ये प्रथमदर्शनी महानगरपालिका स्तरावर अनियमितता घडल्याचे निदर्शनास आल्याने सदर प्रकरणी विभागीय आयुक्त, कोकण भवन यांना अधिक चौकशी करून चौकशी अहवाल सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत, ही वस्तुस्थिती आहे.

तथापि, सदर प्रकरणी विभागीय आयुक्त, कोकण भवन यांचा अहवाल प्रतिक्षित असून शासनाकडून याबाबत वारंवार पाठपुरावा करण्यात येत आहे. सदरचा अहवाल प्राप्त झाल्यावर संबंधिताविरुध्द आवश्यक ती कार्यवाही करण्याची तजविज ठेवण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील स्मार्ट सिटी योजनेबाबत

**(७) १२०९८ (३०-०३-२०२२) श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मुंबई, नवी मुंबई, ठाणे, कल्याण-डोंबिवली, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर व सोलापूर या गावांच्या विकासासाठी स्मार्ट सिटी योजनेची सुरूवात करण्यात आली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकल्प आराखडे, निधी तसेच जागांची उपलब्धता व प्रत्यक्ष अंमलबजावणी याबाबतची सद्य:स्थिती काय आहे, त्याबाबतची थोडक्यात सविस्तर माहिती काय आहे तसेच स्मार्ट सिटीचे प्रकल्प पूर्ण करण्यासाठी स्मार्ट सिटी मिशनच्यावतीने कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१४-१२-२०२२) :** (१) केंद्र पुरस्कृत स्मार्ट सिटी अभियानांतर्गत राज्यातील ठाणे, कल्याण-डोंबिवली, नाशिक, पुणे, पिंपरी-चिंचवड, औरंगाबाद, नागपूर व सोलापूर अशा एकूण ८ शहरांची निवड करण्यात आली आहे.

(२) व (३) स्मार्ट सिटी अभियानांतर्गत विहित आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य हिश्यापोटी अनुज्ञेय निधी स्मार्ट सिटींना उपलब्ध करून देण्यात आला आहे.

सद्य:स्थितीत राज्यात स्मार्ट सिटी अभियानांतर्गत एकूण २९७ प्रकल्प राबविण्यात येत आहेत. सदर २९७ प्रकल्पांपैकी २०२ प्रकल्प पूर्ण झाले असून, उर्वरित प्रकल्पांचे काम प्रगतीपथावर आहे.

---

## अमरावती महानगरपालिकेतील प्रभाग रचनेचे गोपनिय प्रारुप समाज माध्यमामध्ये प्रसिध्द झाल्याबाबत

**(८) १२४०३ (३०-०३-२०२२) श्री.प्रविण पोटे-पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमरावती शहरात राज्य निवडणूक आयोगाद्वारा गोपनीयतेच्या सूचना महानगरपालिकेला असतानाही प्रभाग रचनेचे प्रारुप समाज माध्यमामध्ये प्रसिध्द झाल्याचे माहे जानेवारी, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन महानगरपालिकेतील दोषी अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.

(२) सदर प्रकरणी मुख्य लेखाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समितीने सादर केलेल्या अहवालानुसार श्री.सुधीर गोटे, शाखा अभियंता व श्री.हेमंत महाजन, सहाय्यक अभियंता यांना निलंबित करण्यात आले असून त्यांची विभागीय चौकशी सुरु करण्यात आली आहे.

(३) संबंधितांविरुध्द शिस्तभंग कार्यवाही सुरु केलेली असल्यामुळे विलंबाचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरातील झोपडीधारकांना मालकी पट्टे नोंदणीचे दस्तावेज वाटप करण्याबाबत

**(९) १२५७७ (३०-०३-२०२२) श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहरातील झोपडीधारकांच्या मालकी पट्टयांची रजिस्ट्री करण्याकरीता नागपूर सुधार प्रन्यास व महानगरपालिकेकडे ७० रजिस्ट्री तयार असून राजकीय हस्तक्षेपामुळे नोंदणीचे दस्तावेज वाटप थांबल्याने नागरिक त्रस्त झाले असल्याचे माहे जानेवारी, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन झोपडीधारकांना त्यांच्या नोंदणीचे दस्तावेज वाटप करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.

दिनांक २४/०८/२०१६ व दिनांक ०५/०३/२०१९ रोजी शासन निर्णयाप्रमाणे नागपूर सुधार प्रन्यासच्या जागेवर एकूण ६० झोपडीपट्टा वसलेल्या असून सर्वेक्षण पूर्ण झालेल्या व पट्टेवाटपाची कार्यवाही सुरु असलेल्या झोपडपट्ट्यांची संख्या २९ असून उर्वरित ३१ झोपडपट्ट्यांमध्ये विविध कारणास्तव जसे आरक्षणाने बाधित, रेल्वे बाधित, नाला बाधित एस.आर.ए.ई.डब्ल्यू.एस. ले आऊट इत्यादीमुळे सद्य:स्थितीत पट्टेवाटप करणे शक्य नाही.

पट्टेवाटप सुरु असलेल्या २९ झोपडपट्ट्यांचा प्लेन टेबल सर्वेक्षणानुसार एकूण झोपड्यांची संख्या १३,७१२ एवढी असून पट्टेवाटपास पात्र असलेल्या धारकांना वाटपपत्र निर्गमित करण्यात आलेल्यांची संख्या १०,३९९ एवढी असून, पट्टे पंजीबध्द करण्यासाठी छाननी शुल्क भरण्याकरीता निर्गमित झालेल्या मागणीपत्रांची संख्या ५,११३ एवढी आहे. त्यापैकी मागणीपत्राचा भरणा केलेल्या पट्ट्यांची संख्या ४,६१६ एवढी असून ३,६४७ पट्टेधारकांना करारनामा पंजीबध्द करुन दिलेले आहे.

उर्वरित पट्टेधारक अपूर्ण दस्तावेजांमुळे जसे की, चुकीच्या नावाने आधार कार्ड, सन २०११ पुर्वीचे तसेच चालू वर्षाचे नागपूर महानगरपालिका, नागपूर ची कर पावती, आराजी ५००.०० चौ.फुट पेक्षा जास्त असलेल्या पट्टेधारकांकडून जात प्रमाणपत्र, इमला खरेदी विक्रीपत्र व पट्टा पंजीयन करण्याकरीता रुपये ३५०/- चे मागणीपत्राचे भरणा केलेला नाही.

ज्या पट्टेधारकांनी, उपरोक्त प्रमाणे दस्तावेजाची पुर्तता केल्यावर पट्टेवाटपांची कार्यवाही करण्यात येत आहे.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर येथील बार्टीचे बंद असलेले निवासी प्रशिक्षण केंद्र सुरु करण्याबाबत

**(१०) १२५८५ (३०-०३-२०२२) श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर येथे गत दोन वर्षापासून बंद असलेले महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे राज्यसेवेचे प्रशिक्षण बार्टीकडून परत सुरु करण्यात येणार आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर शहरात बार्टीचे निवासी प्रशिक्षण केंद्र सुरु करण्याची मागणी असूनही या मागणीवर शासन कारवाई करत नसल्याने विद्यार्थ्यांमध्ये नाराजी पसरली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार सदरील प्रशिक्षण केंद्र सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-१२-२०२२) :** (१) व (२) विभागाच्या दिनांक २७/०६/२०२२ रोजीच्या पत्रान्वये नागपूर येथे प्रियदर्शी चॅरीटेबल सोसायटी व्दारा प्रज्ञा प्रबोधिनी करीअर ॲकडमी, नागपूर या संस्थेमार्फत राज्यसेवा पूर्व परीक्षा पूर्व प्रशिक्षण कार्यक्रम सुरू करण्यात आले आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नगरपरिषद रामटेक (जि.नागपूर) अंतर्गत सुजल निर्मल योजनेंतर्गत विकास कामे पूर्ण करणेकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

**(११) १२६९१ (२३-०५-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नगरपरिषद रामटेक (जि.नागपूर) अंतर्गत शहरात पिण्याच्या पाण्याच्या नवीन पाईपलाईन टाकण्याचे काम सुजल निर्मल योजनेंतर्गत मंजूर करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या योजनेंतर्गत शहरात नवीन पिण्याच्या पाण्याची पाईपलाईन टाकण्यात आली असून नगरपरिषदेला अद्यापपर्यंत रुपये ४.५० कोटी निधी शासनाकडून येणे प्रलंबित असल्याने सदर विकास कामे रखडली आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर मंजूर कामाचा निधी रामटेक नगरपरिषदेस प्राप्त करुन रखडलेली विकास कामे पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१४-१२-२०२२) :** (१) होय.

सुजल निर्मल योजनेंतर्गत रामटेक शहरात पिण्याच्या नवीन पाईपलाईन टाकण्याचे काम पूर्ण झालेले आहे.

तसेच, महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर रामटेक शहर वाढीव पाणीपुरवठा प्रकल्पाचे काम पूर्ण झालेले आहे.
(२) हे खरे नाही.

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत मंजूर रामटेक शहर पाणीपुरवठा प्रकल्पातील वितरण व्यवस्थेचे काम पूर्ण करण्यात आलेले असून सद्य:स्थितीस प्रकल्पाच्या अंतिम हप्त्याचा अनुज्ञेय निधी शासनामार्फत वितरित करण्यात आलेला आहे.

(३) महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत मंजूर रामटेक शहर पाणीपुरवठा प्रकल्पातील अंतिम हप्त्याचा अनुज्ञेय निधी शासनामार्फत वितरित करण्यात आलेला आहे. तसेच, प्रकल्पातील उपांगांची कामे पूर्ण झालेली आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रामटेक (जि.नागपूर) तिर्थक्षेत्र विकास आराखड्यातील मंजूर कामांना मान्यता देण्याबाबत

**(१२) १२६९४ (३०-०३-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर जिल्ह्यातील रामटेक तिर्थक्षेत्र विकास आराखडा अंतर्गत विविध विकास कामांसाठी रूपये १५० कोटी निधी मंजूर करून पहिल्या टप्प्यात रुपये ५० कोटीच्या कामांची प्रशासकीय मान्यता देवून काम सुरू करण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने कार्यवाही केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वन आणि पुरातत्व विभागाने जागेची उपलब्धता, पाण्याचा साठा व ना-हरकत प्रमाणपत्र न दिल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाने रुपये ८ कोटी ६३ लक्ष रकमेची विकासकामे रद्द केली आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, जिल्हा तिर्थक्षेत्र विकास समितीने या रद्द कामांना मान्यता दिली नसल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाद्वारे रद्द करण्यात आलेली कामे पुन्हा सुरू करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१०-०१-२०२३) :** (१), (२) व (३) • शासनाने दिनांक २१ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये नागपूर जिल्ह्यातील रामटेक या तिर्थक्षेत्राचा विकास करण्यासाठी रुपये १५० कोटी रक्कमेच्या तिर्थक्षेत्र विकास आराखड्यास तत्वत: सहमती दिली असून या आराखड्याच्या पहिल्या टप्प्यात करावयाच्या रुपये ४९.२८ कोटी रक्कमेच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिली आहे.

- सदर कामांची अंमलबजावणी यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग व पुरातत्व विभाग हे निश्चित करण्यात आले आहेत.
- आराखड्यातील ज्या कामांना वन विभाग व पुरातत्व विभाग यांची परवानगी मिळाली नाही अशा रुपये ८.६३ कोटीच्या कामांच्या निविदा केलेले करारनामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून रद्द करण्यात आलेले आहेत. तथापि, सदरची कामे आराखड्यातून वगळण्यात आलेली नाहीत.
- सदर कामांना वन विभाग व पुरातत्व विभागाची ना-हरकत मिळताच पुन्हा फेरनिविदा करुन कामे करण्याचे सार्वजनिक बांधकाम विभागाचे नियोजन आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर सुधार प्रन्यासने गुंठेवारी भूखंडाचे नियमीत करण्यासाठी केलेली शुल्कवाढ कमी करण्याबाबत

**(१३) १२६९५ (३०-०३-२०२२) श्री.अभिजित वंजारी, श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर सुधार प्रन्यासने गुंठेवारी भूखंडाचे नियमित करण्यासाठी शुल्क रुपये ५६ वरुन रुपये १६८ वाढ केल्याचे माहे नोव्हेंबर, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर शुल्कवाढीला नागरिकांनी विरोध केला आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने गुंठेवारी भूखंडाचे नियमित करण्यासाठी केलेली शुल्कवाढ कमी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे कायआहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे खरे नाही.
(२) याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधी व इतर यांनी नागपूर सुधार प्रन्यासला निवेदन दिले आहे.
(३) शासन निर्णय दिनांक २८/०९/२०१६ अन्वये नागपूर सुधार प्रन्यासकडून गुंठेवारी अधिनियमाखाली निवासी प्रयोजनासाठी भूखंड नियमित करताना आकारावयाच्या विकास शुल्काचा सरसकट दर रुपये ५६/- चौ. फुट इतका निश्चित करुन दिला.

महाराष्ट्र गुंठेवारी विकास (नियमाधीन करणे व श्रेणीवाढ व नियंत्रण) अधिनियम, २००१ प्रशमन व विकास शुल्क निश्चितीबाबत महाराष्ट्र शासन नगरविकास विभाग यांचे शासन आदेश क्रमांक गुंठेवारी-२०२१/प्र.क्र.४८/२०२१/नवि-३० यांचे दिनांक १८/१०/२०२१ च्या आदेशामध्ये विकास शुल्काच्या तीन पट रक्कम वसूल करण्याचे निदेशित केले आहे. सद्य:स्थितीत विकास शुल्काचा दर रुपये ५६/- प्रती चौ. फुट आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरातील मोकाट जनावरांसाठी नंदग्राम प्रकल्प राबविण्याबाबत

**(१४) १३०५८ (३०-०३-२०२२) श्री.अभिजित वंजारी :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शहरात मोकाट जनावरांचा प्रश्न कायम असल्याचे माहे जानेवारी, २०२२ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नागपूर शहरातील मोकाट जनावरांची संख्या लक्षात घेता नागपूर महानगरपालिकेने वाठोडा येथे नंदग्राम प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेतला, परंतु मागील आठ वर्षापासून हा प्रकल्प कार्यान्वित झाला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नागपूर शहरातील मोकाट जनावरांसाठी नंदग्राम प्रकल्प राबविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे खरे आहे.
(२), (३) व (४) नागपूर शहरातील मोकाट जनावरांची संख्या लक्षात घेता, नागपूर महानगरपालिकेने वाठोडा येथे नंदग्राम प्रकल्प १९.३९ हेक्टर जागेवर प्रस्तावित असून सविस्तर आराखडा तयार करण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पास नगर रचना विभागाची मंजुरी प्राप्त आहे. महानगरपालिकेव्दारे नंदग्राम

प्रकल्पाबाबत तयार करण्यात आलेला सविस्तर आराखड्यानुसार प्रकल्प उभारणीकरीता आर्थिक तरतूद उपलब्ध करुन देण्याकरीता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. तथापि, मोकाट जनावरांसाठी प्रकल्प राबविण्याबाबत निधी वितरित करण्याची स्पष्ट तरतूद विभागांतर्गत योजनांमध्ये नाही.

## मुंबई ते सिंधुदुर्ग महामार्ग बांधण्याबाबत

**(१५) १३२३२ (३०-०३-२०२२) श्री.अनिकेत तटकरे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) समृध्दी महामार्गाच्या धर्तीवर मुंबई ते सिंधुदुर्ग महामार्ग बांधण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू महामार्गाच्या बांधकामासाठी किती खर्च अपेक्षित आहे, तसेच सदर महामार्गाचे बांधकाम केव्हा सुरु करण्यात येणार आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने मुंबई ते सिंधुदुर्ग महामार्ग बांधण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रविंद्र चव्हाण (०७-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) सदरहू महामार्गाच्या बांधकामासाठी अंदाजे रुपये ७३,००० कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. सद्य:स्थितीत सविस्तर प्रकल्प तयार करण्यात येत असून अहवालाच्या मंजुरीअंती व निधीच्या उपलब्धतेनुसार काम महामंडळामार्फत हाती घेण्यात येईल.

(३) सद्य:स्थितीत सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचे काम महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत प्रगतीपथावर आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

## भिवंडी ग्रुप कार्यकारी सेवा सहकारी सोसायटी (ता.भिवंडी, जि.ठाणे) यांनी बेकायदेशीररित्या शॉपिंग कॉम्प्लेक्स उभारल्याबाबत

**(१६) १३२८२ (३०-०३-२०२२) श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पद्मानगर मुख्य बाजारपेठ (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील मालमत्ता क्रमांक १७१, १७२, १७३ व १८५ या जागेवर भिवंडी महानगरपालिकेची कोणतीही परवानगी न घेता भिवंडी ग्रुप कार्यकारी सेवा सहकारी सोसायटीचे सभापती, श्री.कमलाकर टावरे यांनी सदरहू जागा हस्तांतरित करुन तळ व पहिल्या मजल्यावर ६७ गाळ्यांचे बेकायदेशीररित्या शॉपिंग कॉम्प्लेक्स उभारले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू शॉपिंग कॉम्प्लेक्सच्या बांधकामात सुमारे रुपये ६० कोटींचा गैरव्यवहार झाला असल्याने त्यावरील कर आकारणी रद्द करुन कमलाकर टावरे यांच्यावर एमआरटीपी अंतर्गत फौजदारी गुन्हा दाखल करण्याची मागणी श्री.सिध्देश्वर कामुर्ती यांनी निवेदनाद्वारे मा.महसूल मंत्री, मा.नगरविकास मंत्री, प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (महसूल), आयुक्त, भिवंडी महानगरपालिका यांचेकडे माहे ऑगस्ट, २०२१ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२८-१२-२०२२) :** (१) होय हे खरे आहे.

मौजे कामतघर स.नं. ४३ /अ/३ या जागेमध्ये महानगरपालिकेची परवानगी न घेता सहकारी भात गिरणीच्या अध्यक्षांनी तळ अधिक पहिल्या मजल्याचे अनधिकृत गाळ्यांचे बांधकाम केलेले आहे.

मौजे कामतघर, ता.भिवंडी येथील स.नं. ४२/अ/३ क्षेत्र ०.६०.० हे आर ही जमीन भोगवटादार सदरी "महाराष्ट्र शासन महसूल खाते" अशी नोंद दाखल असल्याचे तहसिलदार, भिवंडी यांनी कळविले असल्याचे भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिका यांनी कळविले आहे.

(२) श्री.सिध्देश्वर कामुर्ती, नगरसेवक यांनी दिनांक २४/०८/२०२१ रोजी उक्त मिळकतीवर केलेली कर आकारणी रद्द करण्याकरीता निवेदन दिले असल्याचे भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिका यांनी कळविले आहे.

(३) सदर प्रकरणी भिवंडी निजामपूर शहर महानगरपालिकेने खालीलप्रमाणे कार्यवाही केली आहे :-

- अनधिकृत गाळ्यांचे बांधकाम केल्याबाबत संबंधित बांधकामधारकास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम २६० व महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनिमयमातील कलम ५४ अन्वये नोटीस देण्यात आली होती.
- तसेच सदरचे बांधकाम अनधिकृत असल्याने याप्रकरणी संबंधिताविरुध्द भिवंडी शहर पोलीस स्टेशनमध्ये महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ५२ अन्वये दिनांक ११/०९/२०२१ रोजी गुन्हा दाखल केला आहे.
- तथापि, संबंधित बांधकामधारकांनी भिवंडी न्यायालयामधून स्थगिती आदेश प्राप्त करुन घेतले आहेत. सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
- सदर प्रकरणी दिनांक २२/०६/२०२२ रोजी पुढील सुनावणी होणार असून न्यायालयाने स्थगिती आदेश रद्दबातल ठरविल्यास उक्त अनधिकृत बांधकामावर निष्कासनाची कारवाई करण्याची तजवीज भिवंडी निजामपुर शहर महानगरपालिकेने ठेवली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## भिमा कोरेगाव विजय स्तंभाला अभिवादन करण्यासाठीच्या कार्यक्रमात बार्टी संस्थेने विनानिवादा कंत्राटदारांची नेमणूक केल्याबाबत

**(१७) १३३६९ (३०-०३-२०२२) श्री.प्रविण दरेकर, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.सुरेश धस, श्री.प्रसाद लाड, श्री.गोपिचंद पडळकर, डॉ.रणजित पाटील, श्री.निलय नाईक, श्री.प्रवीण दटके, श्री.रमेशदादा पाटील, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भिमा कोरेगाव विजय स्तंभाला अभिवादन करण्यासाठीच्या कार्यक्रमाच्या नियोजनाची जबाबदारी डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन आणि प्रशिक्षण संस्थेला देण्यात आली असल्याचे दिनांक १ जानेवारी, २०२२ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निविदा प्रक्रिया पार न पडता कंत्राटदाराची नेमणूक बार्टी या संस्थेने केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, भीमा कोरेगाव येथे देण्यात आलेले भोजन निकृष्ट दर्जाचे असूनही संबंधित ठेकेदारावर कारवाई करण्याऐवजी देयक अदा करण्यात आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले त्यानुषंगाने संबंधित दोषींवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-१२-२०२२) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर महानगरपालिका, नागपूर अंतर्गत हुडकेश्वर-नरसाळा भागातील अपूर्ण बांधकाम पूर्ण करण्याबाबत

**(१८) १३४९० (२३-०५-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर महानगरपालिका, नागपूर अंतर्गत प्रभाग क्र.२९ मधील हुडकेश्वर-नरसाळा भागातील स्वागत नगर न्यु नरसाळा मार्गाचे व सिलेज लाईन व भूमिगत वीज केबलचे काम सद्य:स्थितीत सुरु आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गत अनेक दिवसापासून सदरहू काम अर्धवट/अपूर्ण स्थितीत बंद पडले असून अर्धवट खोदकाम, अस्ताव्यस्त पडलेली रेती, गिट्टी, बांधकाम साहित्य यामुळे परिसरात धुळ, रेतीचे कण उडून मोठ्या प्रमाणात प्रदूषण होवून अपघात होण्याची शक्यता निर्माण झाल्याची तक्रार परिसरातील नागरिकांनी महानगरपालिका प्रशासनाकडे करुनही त्याकडे महानगरपालिकेचे दुर्लक्ष होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदरहू अर्धवट/अपूर्ण बांधकाम पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे अंशतः खरे आहे,

नागपूर महानगरपालिकेच्या प्रभाग क्र.२९ मधील हुडकेश्वर-नरसाळा भागातील स्वागतनगर येथे सिवर लाईन भूमिगत नालीचे सद्य:स्थितीत कुठलेही काम महानगरपालिकेमार्फत सुरु नाही.

नागपूर महानगरपालिकेच्या प्रभाग क्र.२९ येथील हुडकेश्वर-नरसाळा भागातील स्वागतनगर न्यू नरसाळा मार्गाचे काम सार्वजनिक बांधकाम विभाग, डिव्हिजन क्र.१, नागपूर यांच्यामार्फत सुरु आहे.

नागपूर महानगरपालिकेच्या प्रभाग क्र.२९ येथील भूमिगत वीज केबलचे काम हे महाराष्ट्र राज्य विद्युत पुरवठा कंपनी लिमिटेड (एम.एस.ई.डी.सी.एल.), नागपूर यांच्यामार्फत सुरु आहे.

(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजा महादूला (ता.मौदा, जि.नागपूर) येथील रामदेव बाबा साल्वंट कंपनीवर कारवाई करण्याबाबत

**(१९) १३४९२ (२५-०४-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे महादूला (ता.मौदा, जि.नागपूर) येथील रामदेव बाबा साल्वंट कंपनीमधील रसायनयुक्त पाणी कोणतीही प्रक्रिया न करता परिसरातील नाल्यात सोडत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू कंपनीच्या संचालक मंडळाने प्रदूषण होणार नाही, अशी लेखी हमी परिसरातील बाधित शेतकऱ्यांना देऊनही कंपनी त्याचे उल्लंघन करीत असून कंपनीच्या रसायनयुक्त पाण्यामुळे नाला तसेच परिसरातील इतर नैसर्गिक जलस्त्रोत्र दूषित होवून शेतजमिनी व पिकांचेही मोठ्या प्रमाणात नुकसान होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू कारखान्याची तसेच परिसराची तपासणी करून साल्वंट कारखान्यावर कारवाई करून प्रदुषणावर नियंत्रण ठेवण्याकरीता कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०१-२०२३) :** (१) हे अंशत: खरे आहे.

महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत प्रश्नाधीन उद्योगाच्या दिनांक ०१/०१/२०२० रोजी केलेल्या पाहणीदरम्यान उद्योगाचे स्ट्रार्म वॉटर ड्रेन मार्फत प्रक्रियाकृत सांडपाणी परिसराच्या बाहेर जात असल्याचे दिसून आले होते.

(२) जिल्हा अधीक्षक, कृषी अधिकारी, नागपूर यांच्याकडून प्राप्त अहवालानूसार प्रश्नाधीन कंपनीच्या दूषित पाण्यामुळे शेतीजमीनीचे व पिकांचे नुकसान होत असलेबाबतची कोणतीही तक्रार कृषी विभागास प्राप्त झाल्याचे दिसून येत नाही.

(३) महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत प्रश्नाधीन उद्योगास दिनांक ०१/०१/२०२० रोजी केलेल्या पाहणीदरम्यान घेतलेल्या सांडपाण्याच्या पृथ:करण अहवालानुसार बीओडी (१०९.० मिलीग्रॅम/लिटर) व सीओडी (३१२ मिलीग्रॅम/लिटर) या मानकाचे प्रमाण विहित मर्यादेक्षा जास्त आढळून आल्याने सदर उद्योगास सुधारणा करण्याकरीता महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत प्रस्तावित निर्देश देण्यात आले आहेत.

तद्नंतर सदर उद्योगास दिनांक ११/०१/२०२१ रोजी जल प्रदूषण नियंत्रण यंत्रणा अद्यावत करण्याकरीता महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत सदर उद्योगास अंतरिम निर्देश देण्यात आले होते.

तद्नंतर सदर अंतरिम निर्देशाची अंमलबजावणी करण्याबाबत महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळामार्फत दिनांक १८/०८/२०२१ रोजी केलेल्या पाहणीदरम्यान घेतलेल्या सांडपाण्याच्या पृथ:करण अहवालानुसार प्रक्रियाकृत सांडपाण्याची गुणवत्ता सर्वसाधारणपणे विहित मर्यादेत असल्याचे आढळून आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर सुधार प्रन्यासद्वारा अभिन्यास नियमित केलेल्या अनेक वस्त्यामध्ये नागरी सुविधांसाठी भूखंड राखीव ठेवण्याबाबत

**(२०) १३६१२ (१६-०९-२०२२) श्री.चंद्रशेखर बावनकुळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर सुधार प्रन्यास नागपूर ने अद्यापपर्यंत सुमारे २ हजार ५०० पेक्षा अधिक अभिन्यास (ले-आऊट) मंजूर केले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नागपूर सुधार प्रन्यासच्या नियमानुसार या अभिन्यासामध्ये नागरी सुविधासाठी १० टक्के भूखंड राखीव ठेवण्याच्या अटीवर ही अभिन्यास मंजुरी प्रदान करण्यात येते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर नियमाचे पालन करण्यात आले नसल्यामुळे अनेक ले-आऊट मध्ये भूखंड राखीव ठेवण्यात आले नाही किंवा राखीव भूखंड विकण्यात आले आहे किंवा त्यावर अतिक्रमण करण्यात आले असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने नियमांचे पालन न करणाऱ्या ले-आऊट चालकावर कारवाई करुन सदर भूखंडावरील अतिक्रमण निष्कासित करुन भूखंड पूर्ववत मोकळे करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१३-१२-२०२२) :** (१) हे अंशतः खरे आहे.

नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर यांनी महाराष्ट्र गुंठेवारी विकास (नियमाधीन करणे, श्रेणीवाढ व नियंत्रण) अधिनियम-२००१ अंतर्गत २१०९ अभिन्यास नियमित कलेले आहे.

(२) हे खरे नाही.

तथापि, भूखंड निहित करण्यासंदर्भात गुंठेवारी अधिनियमातील कलम ३(२)(क) नुसार रेखांकनामधील भूखंडाच्या १० टक्के भूखंड नियोजन प्राधिकाऱ्याकडे मोफत निहित करण्यात येतो. परंतु, हे भूखंड विकण्यात न आलेले व बांधकाम न केलेले असतील असे प्रावधान आहे. यानुसार अभिन्यासातील ज्या भूखंडधारकाने प्रन्यासकडे नियमितीकरणाकरीता अर्ज केले नाहीत, अशी भूखंडके निहितीकरणाच्या यादीत टाकण्यात आली आहेत. तथापि, जर भूखंडधारकानी भूखंडाची विक्रीपत्र / कब्जापत्र किंवा करारनामे प्रन्यासकडे सादर करुन मालकी सिध्द केल्यास, असे भूखंड निहितीकरण यादीतून वगळण्यात आले आहेत.

(३) व (४) हे खरे नाही.

प्रन्यासकडे निहितीकरणाकरीता शासन राजपत्र दिनांक १२/०३/२०२१ च्या अधिनियमाद्वारे गुंठेवारीची अंतिम मुदत दिनांक ३१/१२/२०२० पर्यंत वाढविण्यात आली आहे. यानुसार नागपूर सुधार प्रन्यासने निहितीकरणातून वगळलेले सर्व भूखंडके नियमितीकरणाकरीता पात्र होतात.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**राजेन्द्र भागवत**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.